शारिरीक दृष्ट्या अपंग व्यक्तींना
शासकीय सेवेत वर्ग-३ व वर्ग-४ मधील
पदावर नियुक्त्या.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-एसआरव्ही-१०९७/३९७/प्र.क्र.२३/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: २ एप्रिल, १९९७

पहा :- शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-१०८५/१४७/सीआर-७४/१६-अ,
दिनांक: ७ ऑक्टोबर, १९८७

शासन परिपत्रक :-

शारिरीक दृष्ट्या अपंग व्यक्तींना वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदावर नियुक्ती/बदली/पदोन्नती करतेवेळी सहानुभूतीचा दृष्टीकोन ठेऊन त्यांच्या निवासस्थानाजवळ नियुक्ती द्यावी असे आदेश शासनाने उपरोक्त नमूद केलेल्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेले होते. तथापि, या आदेशाची काटेकोरपणे अंमलबजावणी होत नसल्याच्या तक्रारी शासनाकडे प्राप्त झाल्या आहेत. तसेच काही अपंग संघटनांकडून देखील बदल्यांबाबत निवेदने प्राप्त झाली आहेत.

या सर्व बाबींचा विचार करुन सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विविध विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना सूचित करण्यात येते की, बदलीबाबत जे सर्वसाधारण नियम आहेत ते लक्षात ठेऊन, प्रशासकीय सोईनुसार, शक्य असल्यास, शारिरीक दृष्ट्या अपंग उमेदवारांची शासकीय सेवेत नियुक्ती/बदली/पदोन्नती करतेवेळी, सहानुभूतीचा दृष्टीकोन ठेऊन, त्यांच्या राहत्या ठिकाणाजवळ किंवा आसपास, एक सवलत म्हणून, अपंग व्यक्तींची नियुक्ती/बदली/पदोन्नती करण्याचा विचार करावा. या संदर्भात, दि. ७.१०.१९८७ च्या शासकीय परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सूचनांचे आपणास पुन्हा स्मरण करुन देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अ. रा. साळवी ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

सचिव, मंत्रालयाचे सर्व विभाग,

मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,

सर्व मंत्रालयीन विभाग,

सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र. – १२, १३-अ, १४-अ, १८-ब,

निवड फाईल.